नगर परिषदांना चालविलेल्या माध्यमिक व उच्च माध्यमिक (कनिष्ठ महाविद्यालय) या शाळांतील शिक्षक, शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती वेतन कोषागारामार्फत अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण - १००९/सं. क्र. ४९६/कोषा-प्र-५
दिनांक : १२ ऑक्टोबर, २०११.

**संदर्भ :** शालेय शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्रमांक: पोइएन १०९४ / ८२६४७/प्र. क्र. १३५/ म.शि.-१६, दि. १४.०८.१९९७.

**प्रस्तावना --** नगर परिषदांनी चालविलेल्या माध्यमिक व उच्च माध्यमिक (कनिष्ठ महाविद्यालय) शाळांतील जे शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी दि. ०१.०३.१९९५ पूर्वी सेवानिवृत्त झालेले आहेत, अशा कर्मचाऱ्यांचे निवृत्ती वेतन प्रदान आदेश संबंधीत नगर परिषदांनी निर्गमित केलेले आहेत. तसेच दि. ०१/०३/१९९५ नंतर सेवानिवृत्त झालेल्या सदर सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांचे निवृत्ती वेतन प्रदान आदेश महालेखापालांनी निर्गमित केलेले आहेत. शालेय शिक्षण विभागाचे शासन निर्णय क्र. पीईएन - १०९४ / ८२६४७ / प्र. क्र. १३५ / माशि - ६, दि. १४ ऑगस्ट, १९९७ अन्वये अशा कर्मचाऱ्यांचे निवृत्ती वेतनाचे प्रदान आदेश नगर पालीकेने निर्गमित केलेले असल्याने त्यांचे निवृत्ती वेतन महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ च्या नियम ३१७ मधील तरतूदी शिथिल करुन एक विशेष बाब म्हणून महालेखापालांच्या प्राधिकारपत्राशिवाय कोषागारातून अदा करण्याबाबत मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापी, निवृत्ती वेतन प्रदानाबाबत महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील खंड - १ मधील इतर तरतूदी तसेच शासनाने वेळोवेळी प्रस्तुत केलेले नियम / आदेश याबाबतीत लागू आहेत.

निवृत्ती प्रदान आदेश एका कोषागारातून दुसऱ्या कोषागारात वर्ग करण्याची तरतूद म. को. नि. १९६८ खंड - १ नियम ३२४ (अ) प्रमाणे विहित करण्यात आलेल्या आहेत. सदर तरतूदीनुसार कार्यवाही करतांना निवृत्ती वेतन आदेश महालेखापालांनी निर्गमित केलेला आहे, हे गृहित असते. त्यानुसार एका लेखा मंडळामध्ये कोषागार अधिकारी त्याच लेखा मंडळातील दुसऱ्या कोषागारात निवृत्ती वेतन प्रदान आदेश थेट वर्ग करु शकतात. लेखा मंडळामध्ये (Audit Circle) बदल होत असल्यास कागदपत्रे महालेखापालांच्या मार्फत वर्ग केली जातात. परंतु, वर नमुद प्रकरणी निवृत्ती वेतन प्रदान आदेश दि. १.३.१९९५ पूर्वीचे असून ते आदेश महालेखापालांनी निर्गमित केले नसल्याने त्यांचेमार्फत निवृत्ती वेतन प्रदान आदेश वर्ग करण्याची कार्यवाही संबंधीत नसल्याने सदर कार्यवाही करण्यास महालेखापालांनी असमर्थता दर्शविली आहे. त्यामुळे अशा प्रकारे करावयाच्या कार्यवाहीकरीता सुस्पष्ट निदेश निर्गमित करणे आवश्यक झाल्याने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-** नगर परिषदांनी चालविलेल्या माध्यमिक व उच्च माध्यमिक ( कनिष्ठ महाविद्यालय) शाळांतील जें शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी दि. १.०३.१९९५ पूर्वी सेवानिवृत्त झालेले आहेत व ज्यांचे निवृत्ती वेतन प्रदान आदेश संबंधीत नगर परिषदांनी निर्गमित केलेले आहेत, अशा निवृत्ती वेतन धारकांनी कोषागार अधिकाऱ्यांकडे निवृत्ती वेतनाचे हस्तांतरण, महाराष्ट्र राज्यातच परंतू लेखा परिक्षा मंडळाबाहेरील दुसऱ्या कोषागारांकडे वर्ग करण्याबाबत विनंती अर्ज केल्यास त्यांच्या निवृत्ती वेतनाचे प्रदान आदेश त्या कोषागाराकडे महालेखापालांच्या हस्तक्षेपाशिवाय कोषागार अधिकारी हस्तांतरीत करु शकतील.

अशा उपरोक्त प्रकरणी निवृत्ती वेतनाचे प्रदान कोषागारातून करण्यासाठी शासनाच्या शालेय शिक्षण विभागाने वित्त विभागाचे मान्यतेने दि. १४.०८.१९९७ चे शासन निर्णय पोइएन १०९४ / ८२६४७ / प्र. क्र. १३५ / म. शि. - १६ ने महाराष्ट्र कोषागार नियम १९९६८ नियम ३१७ मधील तरतूदी शिथील करुन खास बाब म्हणून

मान्यता घेतली आहे. त्यामुळे याद्वारे एका कोषागारातून दुसऱ्या कोषागारात (लेखा परिक्षा मंडळाबाहेर) नगर पालिका शाळेतील सेवानिवृत्ती शिक्षकांचे निवृत्ती वेतन हस्तांतरणास व प्रदाने करण्याची कार्यवाही महालेखापाल यांचे हस्तक्षेपाशिवाय करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्याप्रमाणे महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ खंड १ नियम ३२४ - अ (अ) खालील टीप मधील तरतूदीमध्ये यथावकाश आवश्यक ती सुधारणा करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून याचा संगणक संकेतांक २०१११००५१६०३३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( स.अ.मु. नकवी )
उप सचिव, वित्त विभाग

प्रति,

राज्यपालांचे सचिव
**मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव**
**उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव**
**सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक**
सर्व विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
**मंत्रालयीन सर्व विभाग**
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
**सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई**
**सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई**
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
**प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई**
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
**महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.**
**महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई**
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
**मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा कोकण भवन नवी मुंबई**
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक
शिक्षण निरीक्षक, उत्तर/दक्षिण/पश्चिम विभाग, बृहन्मुंबई
सर्व नगर परिषदांचे मुख्याधिकारी
सर्व जिल्हा परिषद शिक्षणाधिकारी (माध्यमिक)
**उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई / पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.**
**अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,**
**निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.**
**सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.**
**सर्व उप कोषागार अधिकारी**
बहुजन समाज पार्टी, डी - १, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई - १. (पाच प्रती)
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ. बॅरेक नं. १, योगक्षेमसमोर, वसंतराव भगवान चौक, नरिमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२०. (पाच प्रती)
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्हि. पटेल रोड, मुंबई - ४०० ००४. (पाच प्रती)
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई - ४०० ०१३. (पाच प्रती)
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई - ४०० ०२५. (पाच प्रती)
नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१. (पाच प्रती)
शिवसेना, शिवसेना भवन, रा. ग. गडकरी चौक, दादर, मुंबई - ४०० ०२८ (पाच प्रती)
सर्व कार्यासने, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासने वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कोषा प्र - ५, वित्त विभाग